महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाला भाग भांडवली अंशदान या योजनेचा सन २०१६-१७ चा निधी वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१६/५३९/ प्र. क्र. १२५/ टेक्स-३

नविन प्रशासन भवन, १४ वा मजला
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२
तारीख: १० जानेवारी, २०१७.

**वाचा :**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ, मर्या. नागपूर यांचे पत्र क्र. MSHC/ AC/१०९७/२०१६, दिनांक २६.९.२०१६, व क्र. ११०९/१६, दिनांक २७.९.२०१६
२) संचालक ( वस्त्रोद्योग), नागपूर यांचे पत्र क्र. कार्या-२(१)/ ब-६६०/ ९६६०/२०१६, दिनांक ४ ऑक्टोबर, २०१६.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाची स्थापना कंपनी कायदा १९५६ अंतर्गत, हातमाग विणकरांना विणकाम करण्यासाठी आवश्यक असलेले अर्थसहाय्य उपलब्ध करुन रोजगार मिळवून देणे या सामाजिक उद्देश्याकरीता, तिडके समितीच्या शिफारशीनुसार दिनांक २९.१०.१९७१ रोजी करण्यात आली आहे. हातमागाशी संबंधित बाबींचा अभ्यास करणे व हातमाग उद्योगासाठी सल्लागाराचे काम हे महामंडळ करते. महामंडळाचे अधिकृत भागभांडवल (Authorised Share Capital) रु. ३५००.०० लाख आहे. सन २०१५-१६ अखेर महामंडळास भाग-भांडवल म्हणून रु. ३४३०.०० लाख निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे. उर्वरित रु. ७०.०० लक्ष इतके भागभांडवली अंशदान सन २०१६-१७ मध्ये वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय :

महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या, नागपूर यांस रु. ७०.०० लाख भाग भांडवली अंशदान वितरीत करण्यास शासनाची मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. उपरोक्त रक्कम "महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर " (MAHARASHTRA STATE HANDLOOMS CORPORATION LTD., NAGPUR) यांना RTGS द्वारे वितरीत करण्यात यावी. बँक खात्याचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

**State Bank of India, Ravi Nagar Branch, Nagpur**
**Account No. 30019805446 (Current Account)**
**IFSC Code SBIN0012957**
**MICR Code 440002044**.

३. सदर रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून आहरीत करुन हातमाग महामंडळाला वितरीत करण्यासाठी श्री. र. ग. बोड्डू कार्यासन अधिकारी ( रोख शाखा ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि श्री. ब. बा. चव्हाण, उपसचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१६-१७ करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक व्ही-३
**४८५१** ग्रामोद्योग व लघुउद्योग यावरील भांडवली खर्च
(००) १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका
(०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
(००)(०२) महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाला भाग भांडवली अंशदान
**(४८५१ ००७९)** ३२ , अंशदाने

५. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाला भाग भांडवली अंशदान" या योजनेअंतर्गत सन २०१६-१७ करीता रु. १००.०० लक्ष इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली असून त्या तरतूदीतून सदर निधी वितरीत करण्यात यावा.

६. वित्त विभागाच्या क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ च्या परिपत्रकातील परिच्छेद क्र. ७, ९, ११, १२, १६ व १८ मध्ये नमूद अटी प्रस्तुत प्रकरणी लागू होत नाही. तसेच सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनु. क्र.९ मधील अट क्र. १, २, ३, ४, ५, ९ ची पूर्तता होत असून अट क्र. ६, ८ व १० येथे लागू होत नाहीत.

७. वित्त विभागाच्या वर नमूद दिनांक २० एप्रिल, २०१६ च्या परिपत्रकातील निधी वितरणासाठी आवश्यक अटींची पूर्तता होत असल्याने सदर निधी वितरित करण्यात येत आहे.

८. या योजनेअंतर्गत सन २०१५-१६ मध्ये रु. १००.०० लक्ष निधी वितरीत करण्यात आला असून त्याचे विनियोग प्रमाणपत्र सादर करण्यात आले आहे.

९. सदर निधीतून बांधकाम वा दुरुस्तीची कामे घेण्यात आल्यास वित्तीय अधिकार नियमपुस्तिकेत नमूद वित्तीय अधिकारांचे पालन करण्यात यावे.

१०. या योजनेच्या लेखाशीर्षांतर्गत १ वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

११. सदर अनुदान ECS द्वारे थेट महामंडळाच्या बॅक खात्यात जमा करण्यात येत आहे.

१२. हा निधी बांधकामावर खर्च केल्यास आवश्यक तेथे सक्षम प्राधिका-याकडून प्रशासकीय / तांत्रिक मान्यता तसेच आवश्यक तेथे सचिव समितीची मान्यता घेतल्याशिवाय खर्च करू नये तसेच हा निधी ठेव म्हणून बांधकामाचे स्वरुपात सार्वजनिक बांधकाम विभागास प्रदान करण्यात येऊ नये.

१३. शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने त्यांच्या क्र भांखस-२०१४/ प्र. क्र. ८२/ भाग III/ उद्योग-४, दिनांक १.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रसिध्द केली आहे. सदर शासन निर्णयाच्या तसेच त्यासोबतच्या नियमपुस्तिकेतील तरतूदींचे काटेकोरपणे पालन करून खरेदीसंदर्भात कार्यवाही करण्यात यावी. तसेच खरेदीविषयक रक्कम संबंधित पुरवठादाराच्या नावाने ईलेक्ट्रॉनिक क्लिअरन्स सिस्टीमद्वारे (ECS) अदा करण्यात यावी.

१४. संगणकीकरण संदर्भातील खर्च उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दिनांक १.१२.२०१६ च्या शासन निर्णयासोबतच्या खरेदी नियमावलीतील तरतूदीनुसार शासन मान्य दरपत्रकानुसार/इ-निविदाद्वारे करण्यात यावा, आवश्यक तेथे माहिती व तंत्रज्ञान विभागाची मान्यता घेण्यात यावी.

१५. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाने खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा आदेश निर्गमित करण्यापूर्वी अशा खरेदीसाठी रितसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत.

१६. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळाने खरेदी विषयक प्रक्रिया अद्ययावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा.

१७. ह्या निधीतून खरेदी करण्यात येणा-या साहित्याची देयके प्रत्यक्ष वस्तू प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना ( ECS द्वारे ) अदा होतील याची दक्षता घ्यावी.

१८. श्री. र. ग. बोड्डू, कार्यासन अधिकारी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी उपरोक्त रक्कम आहरीत करुन महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर यांना तातडीने RTGS द्वारे वितरीत करावी.

१४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर यांनी उपरोक्त रकमेच्या खर्चाचे विनियोग प्रमाणपत्र, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर मार्फत शासनास सादर करावे. **सदर रक्कम ज्या प्रयोजनासाठी अदा करण्यात येत आहे, त्याच प्रयोजनासाठी वापरण्यात यावी.**

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११११४५०३७९४०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vilas Ramdas Thakur

Digitally signed by Vilas Ramdas Thakur
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c8b1e52c5c4f922ab6eb7a0b44101c838aea34f29fbff0aebe9d85c3de3468c2, cn=Vilas Ramdas Thakur
Date: 2017.01.11 14:54:20 +05'30'

**( वि. रा. ठाकूर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर
३. संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर
४. प्रधान सचिव ( वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वस्त्रोद्योग महामंडळ, नागपूर
६. उपसचिव (वस्त्रोद्योग) ( टेक्स-३) , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७. उपसचिव ( रोख शाखा ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अवर सचिव ( १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
९. कार्यासन अधिकारी ( रोख शाखा ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. कोषागार अधिकारी, मुंबई
११.वित्त विभाग ( व्यय-२/ अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती ( टेक्स-३)